# पुर्वजन्मातील त्रासचा पुरता भोग भोगूनच तो संपवावा लागला. विजेरत्ने - राणी सवसोना

**डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत खरा आहे काय ? भाग १२**

**E Book 177**

प्राचार्य अद्व्यानंद गळतगे,
भोज ५९१२६३, जि. बेळगाव, (कर्नाटक) भ्रमणध्वनी- ९०२००२५८५

विजेरत्ने याचा जन्म १७ जानेवारी १९४७ रोजी श्रीलंकेच्या रत्नपूर जिल्ह्यातील उरगलकल्तोता या गावी झाला. त्याच्या वडिलांचे नाव एच्.ए.तिलेरत्ने हामी व आईचे नाव ई.ए. हुरनाल हामी. तिलेरत्ने हे शेती करणारे व किरकोळ व्यापारी होते. विजेरत्नेचा जन्मतःच उजवा हात बारीक व आखूड होता. बोटेही आखूड होती शिवाय ती एकमेकांना चिकटलेल्या स्वरूपात होती, तसेच त्याच्या छातीची उजवी बाजू स्नायू नसल्यामुळे खोलगट होती. (छायाचित्रे पाहा, दोन्ही छायाचित्रे जन्मतःच विजेरत्नेच्या १८ व्या वर्षी घेतलेली आहेत, जन्मतःच चिकटलेली बोटे शस्त्रक्रियेने सुटी केलेली



आहेत.) विजेरत्नेचे हे जन्मदोष मागच्या जन्मातील काही कारणामुळे निर्माण झालेले असावेत असा तिलेरत्ने या त्याच्या वडिलांनी तर्क केला. तथापि १९२८ साली वयाच्या २४ व्या वर्षी वारलेल्या रत्राण हामी या आपल्या लहान भावाचाच विजेरत्नेच्या रूपाने हा पुनर्जन्म झाला असल्याची तिलेरत्ने हामीची खात्री झाली होती. ही त्याची खात्री दोन कारणामुळे झाली होती. एक, विजेरत्नेचा तोंडवळा व रत्राण हामीचा तोंडवळा एकच होता. रंगही दोघांचा सारखाच

काळा होता. दुसरे कारण म्हणजे २४ वर्षाच्या रत्राण हामीने आपला थोरला भाऊ तिलेरत्ने याला मृत्यूपूर्वी तुझा मुलगा म्हणून परत येईन' असे सांगितले होते.

पुढे विजेरत्ने अडीच वर्षाचा असताना एकदा आपल्याशीच बोलत असताना हुरताल हामी या त्याच्या आईने ऐकले. तो स्वतशीच म्हणत होता : मागच्या जन्मी माझ्या बायकोचा खून केल्यामुळे माझा हात असा सुकला आहे. तो मागच्या जन्मान तील अशा आणखी बऱ्याच गोष्टी स्वतशीच बोलत होता, ज्या तिने जवळ जाऊन ऐकल्या; पण तिला त्याचा काही अर्थ झाला नाही, म्हणून तिने आपला नवरा तिलेरत्ने याला त्याचा काही अर्थ लागतो का असे विचारले, तेव्हा त्याने आपला भाऊ रत्राण हामी याने आपल्या बायकोचा खून केल्याची घटना तिला सांगितली, जी तिच्या तिलेरत्नेशी झालेल्या विवाहाच्या बऱ्याच वर्षापूर्वी घडलेली असल्यामुळे तिला माहित नव्हती, ती घटना अशी:

१९०४ साली जन्मलेल्या रत्राण हामीचे लहानपणीच लग्न झाले होते, पण पत्नी लहानपणीच वारल्यामुळे २२ वर्षाच्या रत्राण हामीने उग्गल कल्तोतापासून ८ कि.मी. अंतरावरील नवानेलिया या खेडयातील पोदी मोनिक नावाच्या एका मुलीचे प्रियाराधन केले. नंतर त्या दोघांचा कायदेशीर विवाह झाला. पुढे काही दिवसानी नवानेलिया या तिच्या गावी तिला 'नांदावयास आपल्या गावी आणण्यासाठी गेला. तेव्हा तिने त्यास नकार दिला. (कदाचित दुसऱ्या एखाद्या अधिक आकर्षक तरुणाशी तिने दरम्यान संधान बांधले असावे.) तेव्हा तो अतिशय संतप्त झाला व परत आपल्या गावी येऊन तेथे त्याने एक चाकू घेऊन त्याला चांगली धार लावली. त्याच दिवशी म्हणजे १४ ऑक्टोबर १९२७ रोजी संध्याकाळी नवानेलियाला तो गेला व पोदी मोनिकेचा त्या चाकूने खून केला. नंतर त्याला पकडण्यात येऊन त्याच्यावर रीतसर खुनाची केस चालवण्यात आली. त्याने गुन्हा नाकबूल करून स्वतःचा बचाव केला की आपण आपल्या पत्नीला नांदावयास आणण्यासाठी तिच्या घरी गेलो असताना आपल्याला तेथे मारण्यात आले. त्या



विजेरत्नेची व्यंगे दर्शवणारी चित्रे

झटापटीत आपण चाकू मारला, पण तो तिचा खून करण्याच्या इराद्याने मारला नव्हता. पण तेथील साक्षीदारांनी सांगितले की त्याने चाकूने वार करून पोदी मोनिकेचा खून केल्यामुळे आपण त्याला मारले. न्यायालयाने साक्षीदारांच्या साक्षी स्वीकारून रत्राण हामीने पोदी मोनिका या आपल्या पत्नीचा खून केल्याचा निर्णय दिला व त्याला फाशीची शिक्षा सुनावण्यात आली. फाशी जाण्यापूर्वी त्याला भेटायला आलेल्या तिलेरत्ने या आपल्या दुःखी थोरल्या भावाचे 'मी तुझा मुलगा म्हणून परत येईन' असे म्हणून सांत्वन केले. १९२८ च्या जुलैमध्ये रत्राण हामीला त्याच्या २४ व्या वर्षी फाशी देण्यात आली. त्यानंतर तिलेरत्ने याचा विवाह उग्गलकोलतोता या त्याच्या गावापासून ४० कि.मी. अंतरावरील एका लहान खेड्यातील हुरताल नावाच्या मुलीशी झाला व प्रारंभी सांगितल्याप्रमाणे १७ जानेवारी १९४७ रोजी विजेरत्नेच्या रूपाने रत्राण हामी त्या जोडप्याच्या पोटी जन्माला आला, हा विजेरत्नेचा जन्म रत्राण हामीच्या मृत्यूनंतर साडे अठरा वर्षांनी झाला होता.




प्रारंभी विजेरत्ने मागच्या जन्माच्या गोष्टी स्वत:शीच बोलत असे, पण नंतर इतरांनी विचारल्यानंतर आपल्या मागच्या जन्मातील सर्व गोष्टी तो खुलेपणाने सांगत असे. आपल्या गावी नांदावयास येण्यास नकार दिल्यामुळे आपण पोदी मोनिके या आपल्या पत्नीचा खून केल्याचे तो उघडपणे सांगत असे. (रत्राण हामी म्हणून आपण न्यायालयात स्वतःचा केलेला बचाव खोटा होता हे तो अशारीतीने स्वतःच मान्य करीत होता.) आपल्या हाताचा व छातीचा जन्मदोष आपल्या पत्नीचा खून केल्यामुळे निर्माण झाले असल्याचेही तो म्हणे, ज्या (उजव्या) हाताने आपण तिचा खून केला तो

हात सुकला असल्याचे व त्या हाताची बोटे (त्यामुळे) दोषयुक्त बनली असल्याचे म्हणे. तसेच तिच्या उजव्या छातीत चाकू खुपसल्यामुळे आपल्या उजव्या छातीचा दोष निर्माण झाला असल्याचेही तो सांगत असे. वास्तविक त्याने पोदी मोनिकेच्या डाव्या कुशीत चाकू खुपसला होता. पण ती त्याला समोर असताना तिची डावी बाजू त्याच्या उजवीकडे असल्यामुळे तिच्या उजव्या बाजूत आपण चाकू खुपसल्याचे तो समजत होता. (अशी बाजूची गल्लत अनेकदा होत असल्याचे पुनर्जन्म प्रकरणात साक्षीदारांच्या बाबतीत ही घडताना आढळून येते.) वयाच्या ५व्या वर्षापर्यंत तो मागच्या जन्मातील अनेक गोष्टी सांगत असे. पण नंतर त्याच्या त्या स्मृती धूसर बनल्या. पण आपल्या पत्नीच्या खुनाच्या व फाशीच्या शिक्षेच्या विस्तृत स्मृती मात्र त्याच्या प्रौढपणी सुध्दा अगदी ताज्या राहिल्या. (मागच्या जन्मी बिशनचंद कपूरचीही आपण आपल्या प्रतिस्पर्ध्याचा खून केल्याची स्मृती अशाच रीतीने प्रौढपणीही ताजी राहिली असल्याची आढळून आली होती.) विजेरत्ने बालक असतानाचे त्याचे पुनर्जन्म संशोधन कोलंबोचे बौद्ध धर्मिय  प्रशिक्षक पूज्य आनंद मैत्रेय यांनी प्रथम केले. नंतर त्यानी श्रीलंकेचे पुनर्जन्म संशोधक फ्रान्सिस स्टोरी यांना त्या प्रकरणाची माहिती दिली. फ्रान्सिस स्टोरी यांनी परत स्टिव्हन्सनना हे प्रकरण कळवले. स्टिव्हेन्सननी १९६१ साली, म्हणजे विजेरत्ने १४ वर्षांचा झालेला असताना त्याची पहिल्यांदा भेट घेतली. त्यावेळी तो आपल्या मागच्या जन्मातील बऱ्याच गोष्टी विसरला असला तरी पोदी मोनिकेच्या खुनाच्या व फाशीच्या विस्तृत घटना त्याला अगदी ताज्या असल्याप्रमाणे आठवत होत्या असे स्टिव्हन्सनना आढळून आले. त्याला आपल्या मागच्या जन्मातील पत्नीचा खून केल्याचा पश्चात्ताप झाला नसल्याचे स्टिव्हन्सनना यावेळी आढळून आले. लग्नाची बायको नांदावयास येण्यास तयार नसेल तर या जन्मातही आपण तिचा खून करू असे तो त्यांना म्हणाला. पण काही वर्षानंतर त्याची ही भूमिका बदलली, १४ जानेवारी १९६९ रोजी, म्हणजे आपल्या वयाच्या २२ च्या वर्षी स्टिन्टेन्सनना त्याने इंग्रजीतून एक पत्र लिहिले असून त्यामध्ये तो म्हणतो की लग्नाची बायको नवऱ्याची आज्ञा न पाळणे ही आपल्या समाजातील एक सर्वसामान्य गोष्ट असून अशा वेळी सामोपचाराने तिची समजूत काढण्याचा प्रथम प्रयत्न करावा. त्या प्रयत्नाला यश आले नाही तर शेवटी तिला घटस्फोट देणे हाच योग्य मार्ग आहे. कारण अनावर झालेल्या क्रोधाचा परिणाम म्हणून अनेकाची जीवित हानी होऊ शकते असे शेवटी त्याने म्हटले असून, या संदर्भात बुद्धाच्या सहिष्णुतेच्या शिकवणुकीचा पाठपुरावा त्याने केला आहे. वरील पत्रावरून विजेरत्नेचा व्यक्तिविकास झाला असल्याचे दिसून येते. पण तो

सहजासहजी झालेला नाही. ही किंमत या जन्मात त्याला मोजावी लागल्याचे दिसते. उदाहरणार्थ तो हायस्कूलमध्ये शिक्षण घेत असताना एका मुलीकडे आकर्षित झाला. तिनेही त्याला थोडा प्रतिसाद दिला. पण नंतर तिने त्याच्याकडे पूर्ण दुर्लक्ष केले. त्याने ती मागच्या जन्मा**ती**ल पोदी मोनिके असल्याचा समज करून घेतला होता. तिने त्याच्याकडे दुर्लक्ष केल्याचा त्याच्या मनावर मोठा आघात झाला व तो मनोरुग्ण बनला. वडील तिलेर**त्ने** यांना त्याला मनोरुग्णांच्या इस्पितळामध्ये ठेवावे लागले. बरेच दिवस तेथे त्याला काढावे लागले, पण शेवटी तो त्या मनोरोगातून सावरला. तथापि शिक्षणाकडे त्यांचे दु**र्लक्ष** होऊन काही वर्षे फुकट गेली, मागच्या जन्मातील घटनांचा किंवा त्यांच्या आठवणींचा हा परिणाम मानता येईल, शिवाय चौदाव्या वर्षी पूर्ण एक आठवडा तो स्वतला पक्षी समजून झाडांच्या फांद्या मोडू लागला होता, इतर प्राण्यांच्या योनीत माणसाचा जन्म होतो या बौध्द धर्मातील श्रध्देचा हा परिणाम असू शकतो असे स्टिन्टेन्सन यांनी म्हटले आहे. फ्रा**न्सिस** स्टोरी, गुणरले आणि रडुलगेडा या (स्टिन्हेन्सनपूर्वीच्या) विजेरत्नेच्या पुनर्जन्म संशोधकांनी, रत्राण हामीला फाशी दिल्यानंतर व विजेरत्ने म्हणून जन्म घेण्यापूर्वीच्या मधल्या काळात आपण पक्षी बनलो होतो असे आपणास सांगितले असल्याचे स्टिव्हन्सन याना सांगितले आहे. बौध्द (व हिंदू) धर्मातील समजुतीप्रमाणे वाईट कर्मामुळे मनुष्याचा पशुपक्ष्यांसारख्या तिर्यक योनीत जन्म घ्यावा लागतो या कल्पनेमुळे व पोदी मोनिकेचा खून वाईट कर्मामुळे आपला पक्षी योनीत जन्म झाल्याचा विजेरत्नेला भ्रम झाला होता, असे आपण मानत असल्याचे स्टिव्हन्सन यानी म्हटले आहे. असे मानण्यास आणखी एक कारण त्यानी असे सांगितले आहे की इतर प्राण्यांच्या योनित जन्म घेतल्याचे सांगणाऱ्या व्यक्ती अत्यंत तुरळक असून त्याविषयीचा पुरावा तपासणे अत्यंत कठिण आहे. तथापि इतर प्राण्यात जन्म घेतल्याचे सांगणाऱ्या 30 पेक्षा कमी व्यक्ती आढळलेल्या आहेत असे त्यानी अन्यत्र म्हटले आहे.

## या प्रकरणाचे वेगळे वैशिष्ट्य

विजेरत्नेच्या पुनर्जन्म प्रकरणाचे वेगळे वैशिष्ट्य सांगताना स्टि**व्हे**न्सन यांनी म्हटले आहे की इतर पुनर्जन्म प्रकरणात ज्याचा खून झाला आहे अशा व्यक्तीच्या पुनर्जन्मातील शरीरावर खून करताना शस्त्रास्त्रामुळे झालेल्या जखमांच्या खुणा व जन्मदोष निर्माण झाल्याच्या आढळतात. याच्या उलट या प्रकरणात ज्याने खून केला आहे त्याच्याच पुनर्जन्मातील शरीरावर जखमांच्या खुणा वा जन्म दोष निर्माण

झाल्याच्या आढळतात. खून किंवा असलेच वाईट कर्म केल्यामुळे पुढील जन्मात शारीरिक जखमा किंवा जन्मदोष निर्माण होणे हे त्या वाईट कर्माची शिक्षा (retribution) असल्याची हिंदू व बौद्ध धर्मात मानण्यात आले आहे असे स्टिव्हेन्सन यांनी म्हटले असून अशा वाईट कर्माच्या शिक्षेची चार पुनर्जन्म प्रकरणे आपल्याला आढळली असल्याची सांगितले आहे. त्यापैकी विजेरलेचे प्रकरण एक असून याच ग्रंथात असलेच एक जुळ्याचे प्रकरण त्यानी विस्ताराने दिले आहे. ते प्रकरण आपण पुढील लेखात पाहणार आहेत, बाकीची दोन प्रकरणे ब्रह्मदेशातील असून ती उ न्येइन व मा नग्वे क्यी, या अनुक्रमे पुरुष व स्त्री यांची असून ती आपण तपशीलात प्रसिद्ध केलेली नाहीत असे त्यांनी म्हटले आहे. एका जन्मातील वाईट वा चांगल्या कर्माबद्दल पुढील जन्मात अनुक्रमे जन्मदोषरूपी शिक्षा वा पदोन्नतिरूपी लाभ होणे हा हिंदू व बौद्ध धर्म मतानुसार कर्मसिद्धांतच असून कर्मसिद्धांताविषयी स्टिव्हेन्सन यांचे म्हणणे काय आहे याची चर्चा शेवटी करावयाची आहे. पुढील एक प्रकरण त्यानी उदाहरण कर्म सिद्धांताच म्हणून दिलेले नसले तरी ते कर्मसिद्धांतात मोडत असल्याचे त्यांचे वर्णन दाखवून देत असल्यामुळे ते त्यांनी दिल्याप्रमाणे थोडक्यातच देत आहे.

## राणी सक्सेना

राणी सक्सेनाचा जन्म अलाहाबाद (प्रयागराज) येथे झाला. तिला मागच्या जन्मातील वाराणसीतील एका श्रीमंत वकिलाच्या जीवनाची अगदी तंतोतंत आठवण होत होती. इतकी अचूक की त्याचे एक उदाहरण म्हणून एका विश्वसनीय व्यक्ती कडून मिळालेली माहिती स्टिव्हेन्सननी सांगितली आहे. ती अशी: राणी सक्सेना त्यावेळी एका घरात होती. त्या घराच्या दुसऱ्या एका खोलीत एक मनुष्य बोलत होता, जो तिने या जन्मी त्याच्या पूर्वी कधी पाहिला नव्हता, ना तिच्या ओळखीचा होता. पण तो तिच्या मागच्या जन्मातील वकिलाच्या ओळखीचा होता, तिने केवळ याच्या बोलण्याच्या आवाजावरून त्याला बरोबर ओळखले होते. जणू काही ती हल्लीही वकिलच होती.

तिने सांगितले की आपण मागच्या जन्मात अत्यंत श्रीमंत वकील होतो. आपण स्त्रियांचे शोषण केले होते. त्यामुळे आपल्याला परमेश्वराने शोषण झालेल्या स्त्रियांचा अनुभव काय असतो हे कळण्यासाठी स्त्रीच्या जन्मात शिक्षा म्हणून घातले आहे.

त्यासाठी श्रीमंत असलेल्या आपल्याला गरीब जीवन जगण्यास भाग पाडले आहे. हे खरे होते. तिच्या आई वडिलांनी तिचे ज्या माणसाशी लग्न जुळवले होते तो मातीच्या कच्च्या घरात राहणारा एक गरीब मनुष्य होता. त्यामुळे तिला मागच्या श्रीमंत वकिलाच्या जीवनाची आठवण सतत सतावत होती. तसेच स्त्री असूनही आपण पुरुष असल्याची भावना तिला सोडून जायला तयार नव्हती. परिणामी ती बोलताना हिंदीतील 'जाऊंगा, करूंगा' अशी पुरुषी क्रियापदे वापरी. इच्छेविरुद्ध मुलांना जन्म देणे व संभाळणे करणे तिला करावी लागली. आपण पुरुष असून स्त्रीचे जीवन जगावे लागल्याची तिचा जीवंत भावना ही एक तिला दिलेली मानसिक शिक्षाच म्हणता येईल.

याच्या उलट घडलेले एक प्रकरण म्हणून प्रस्तुत लेखकाच्या थोरल्या वेदांत या चिरंजीवाचे उदाहरण देती येईल. मद्रास जवळील तांबरम् येथील नाडी केंद्रात त्याच्या नावाचा ग्रंथ मिळाला. त्यात तो मागच्या जन्मात स्त्री असल्याचे व त्या जन्मात तिने कित्येक पुरुषांचे शोषण केल्याचे वर्णन आढळले. मागच्या जन्माची त्याला आठवण होत नसली तरी या जन्मात त्याबद्दलची शिक्षा म्हणून तिने स्त्रीजन्मात शोषण केलेल्या पुरुषांचा अनुभव काय असतो हे कळण्यासाठी तिला पुरुष जन्म मिळाला व बरीच वर्षे तो मनोरुग्ण (psychotic) बनला. ही शिक्षा असल्याचे एक लक्षण म्हणजे तो मानसोपचार करून घेण्यास मुळीच तयार नव्हता. आम्हाला त्यासाठी त्याच्यावर शेवटी जबरदस्ती करावी लागली. रोगातून बरे होण्यास, त्याला बरीच वर्षे लागली. म्हणजे त्या त्रासाचा पुरता भोग भोगूनच तो संपवावा लागला. कदाचित त्याच्या एखाद्या जन्मातील पुण्य कृत्यामुळे किंवा आमच्याशी असलेल्या त्याच्या पूर्व नात्यामुळे त्याला आमच्या आध्यात्मिक कुटुंबात जन्म मिळाला असावा. तो नंतर मोठा ईश्वरनिष्ठ व अध्यात्मवादी बनला. त्या शिवाय आपल्या विषयात श्रेष्ठ तज्ञ बनून विद्यार्थीप्रिय प्राध्यापक म्हणून शिक्षणक्षेत्रात मोठा नावलौकिक मिळविला आहे.

(Reincarnation and Biology: Ian Stevenson, cases of Rein - carnation Type - Vol. II, Ian Stevenson, Children Who Remember Their Past Lives Ian Stevenson)

टीप: मागचे मा खिन् मारहतूचे प्रकरण व त्यामध्ये आलेले सर्व संदर्भ Reincarnation and Biology - Ian Stevenson या ग्रंथातील आहेत.

...